**“मुख्यमंत्री - माझी लाडकी बहीण” या योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक - मवबा-२०२५/प्र.क्र.८३/कार्या-२

नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,

हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक - ०२ मे, २०२५.

**संदर्भ :-**

(१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि-२०२४/प्र.क्र.९६/कार्या-२, दि.२८.०६.२०२४, दि.०३.०७.२०२४, दि.१२.०७.२०२४ व दि.२५.०७.२०२४.

(२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि-२०२४/प्र.क्र.१५६/कार्या-२, दि.०५.०७.२०२४.

(३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि-२०२४/प्र.क्र.१५१/कार्या-२, दि.०८.०७.२०२४.

(४) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि-२०२४/प्र.क्र.१६६/कार्या-२, दि.१५.०७.२०२४ व दि.१९.०७.२०२४.

(५) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि-२०२४/प्र.क्र.१४९/कार्या-२, दि.०७.०८.२०२४ व दि.२४.०९.२०२४.

(६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-२, दि.०७.०४.२०२५.

(७) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय, क्र.बीजीटी-२०२५/प्र.क्र.६५/अर्थसंकल्प (विघयो), दि.३०.०४.२०२५.

**प्रस्तावना :-**

राज्यातील महिलांच्या आर्थिक स्वातंत्र्यासाठी आणि त्यांच्या आरोग्य आणि पोषणात सुधारणा करण्यासाठी आणि कुटूंबातील त्यांची निर्णायक भूमिका मजबूत करण्यासाठी महाराष्ट्र राज्यात “मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण” या योजनेची अंमलबजावणी करण्यात येत आहे.

सदर योजनेंतर्गत पात्र कालावधी दरम्यान राज्यातील २१ ते ६५ या वर्षे वयोगटातील प्रत्येक पात्र विवाहित, विधवा, घटस्फोटित, परित्यक्त्या आणि निराधार महिला तसेच त्या कुटूंबातील केवळ एक अविवाहित महिलेला तिच्या स्वत:च्या आधार संलग्न बँक खात्यात थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (Direct Benefit Transfer) दरमहा रु.१,५००/- इतकी रक्कम देण्यात येते.

सदर योजनेसाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठीच्या अर्थसंकल्पात मागणी क्र.एन-३, लेखाशिर्ष २२३५ डी७६७ अंतर्गत ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.३९६०.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून रु.४१०.३० कोटी (अक्षरी रु.चारशे दहा कोटी तीस लाख फक्त) इतका निधी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) महिला व बाल विकास विभागास उपलब्ध केला आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" या योजनेच्या अनुसूचित जाती व नवबौध्द प्रवर्गातील घटकांसाठी मागणी क्र.एन-३, लेखाशिर्ष २२३५ डी७६७ अंतर्गत ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.३९६०.०० कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" या योजनेंतर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द प्रवर्गातील घटक कार्यक्रमांतर्गत पात्र लाभार्थ्यांना लाभ अदा करण्यासाठी रु.४१०.३० कोटी (अक्षरी रु.चारशे दहा कोटी तीस लाख फक्त) निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदान हे सशर्त अनुदान आहे.

२. सदर योजनेवरील खर्चासाठी उप सचिव (का-२), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई हे "नियंत्रण अधिकारी", तसेच कक्ष अधिकारी (रोख शाखा), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई हे "आहरण व संवितरण अधिकारी" राहतील.

३. सदरचा वितरीत करण्यांत आलेला निधी आहरण व संवितरण अधिकारी यांनी आभासी वैयक्तीक ठेव लेखा (VPDA) प्रणालीद्वारे "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" या योजनेसाठीच्या राज्यस्तरावरील स्टेट बॅक ऑफ इंडिया खाते क्र.००००००४३८००८४५६४३ मध्ये जमा करण्याच्या अनुषंगाने तात्काळ कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत तसेच, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.५४१/२०२५/व्यय-१४, दि.२९.०४.२०२५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

५. या शासन आदेशाद्वारे वितरीत करण्यात आलेल्या निधीचा खर्च सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाज कल्याण, ७८९-अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०२) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०२) (०१) मुख्यमंत्री माझी लाडकी बहीण योजना (कार्यक्रम) (२२३५ डी७६७) या लेखाशिर्षांतर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टांकरीता (अनुसूचित जाती व नवबौध्द प्रवर्गातील घटकांसाठी) वितरीत करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संकेतांक २०२५०५०२१३०७५७८६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASAD VINAYAKRAO KULKARNI

Digitally signed by PRASAD VINAYAKRAO KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=83b8be9eb843dd6eccbd6aa4f9eecd0b5f7aca67ff32b2eef7b9ed2d85ab9442, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D19730DDF785210D50C28934B75E9B7B4F5D06B6181CF1901CE3E48EC9E3985, cn=PRASAD VINAYAKRAO KULKARNI
Date: 2025.05.02 13:09:49 +05'30'

**( प्र.वि. कुलकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

(१) मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

(२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
(३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(४) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
(५) सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(६) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(७) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
(८) महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
(९) महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा), मुंबई/नागपूर.
(१०)अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(११)निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
(१२)नियंत्रण अधिकारी तथा उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(१३)आहरण व संवितरण अधिकारी तथा कक्ष अधिकारी (रोखशाखा), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(१४)कक्ष अधिकारी (व्यय-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(१५)कक्ष अधिकारी (का-०४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याचा विनंतीसह अग्रेषित.
(१६)निवडनस्ती, कार्यासन-२.